अस्तरावरील पाषाण चित्रात राजा शुद्धोदनाच्या दरबारातील दृश्य आहे. त्यात तीन ज्योतिषी राजा शुद्धोदनास बुद्धाची आई, मायाला पडलेल्या स्वप्नाचा अर्थ समजावून सांगत आहेत. इ.स. दुसऱ्या शतकातील नागार्जुन-कोंडा येथील एका शिळेत कोरलेल्या या प्रसंगात खालच्या बाजूला बसलेला राजचिटणवीस स्वप्नाचा हा अर्थ लिहून घेत आहे. भारतीय लेखन कलेचा शिल्पबद्ध पुरावा देणारे हे अत्यंत पुरातन शिल्प असावे असा अंदाज आहे.

राष्ट्रीय संग्रहालय, नवी दिल्ली, यांच्या सौजन्याने

**He Tanmay Dhuli (हे तन्मय धुळी):**
Marathi translation by Radha Joglekar of Pratibha Satpathy's
Award winning poetry collection *Tanmay Dhuli* in Oriya
Sahitya Akademi, New Delhi (2017), ₹ One Hundred Twenty Five


First Edition : 2017

**Published by**
SAHITYA AKADEMI

**Head Office**
Rabindra Bhavan, 35, Ferozeshah Road, New Delhi 110 001

**Sales Department**
Basement in 'Swati', Mandir Marg, New Delhi 110 001

**Regional Offices**
172, M. M. G. S. Marg, Dadar (East), Mumbai 400 014
4, D.L. Khan Road, Kolkata 700 025
Central College Campus, Dr Ambedkar Veedhi, Bengaluru 560 001

**Chennai Office**
Guna, 443 Anna Salai, Teynampet, Chennai 600 018

**ISBN 978-81-260-5133-5**

**Price: ₹ 125/-**

E-mail : rs.rom@ sahitya-akademi.gov.in
Website : http://www.sahitya-akademi.gov.in

Typeset by Sanjay Kanekar, Mumbai, and,
Printed at Mouj Printing Bureau, Mumbai – 400 004

# अनुक्रमणिका

## नायिका

ऐक,
दुसऱ्या कोणामुळे
कधीच नव्हे
तर स्वतःच्याच हाताने मी
भोगत आहे यातना
स्वतःच एक जाळ बनते
जखडून घेऊन त्यात स्वतःला
तडफडत राहते.

निंदा, अपयश,
व्याकुळता, हाहाकार
मीच बोलावून आणते
निष्ठुरता, प्रतारणा,
खोटेपणाच्या प्रवाहात
मी उडी मारते.
पंचप्राण फुटून
रक्त भळाभळा वाहते
रक्तनदीचा तो प्रवाह
माझा सगळा ताठा
अहंकार ओढून नेते.
तरीही झिरझिरीत वस्त्रे नेसून
शुद्ध रत्नाच्या
सिंहासनाला
कवटाळून बसते मी

पुरुष –
भिक्षुक, चांडाळ

कधी राजेश्वर
तर कधी
ध्यानमग्न संन्यासी होऊन
उभा ठाकतो
त्याच सिंहासनाजवळच्या जमिनीवर
स्वेच्छेने.

मी परम कृपण
मीच चरम दान
एका बिंदूवर मीच
समस्या आणि समाधान,
भळभळणाऱ्या जखमेपासून
मिळणाऱ्या अधीर आनंदाप्रमाणे
मूल्यवान
लीला करणारा मीच
मीच मंगल करणारा.

नायिका मी
मुख्या, मी अनन्या
विध्वंस करणाऱ्या काळाच्या विरोधात
उभी राहाते
प्रत्येक शब्दातून, कटाक्षातून
माझ्या हसण्याच्या लकबीतून
आदरातून, आनंदातून,
अभिमानातून, क्रोधातून,
इतकेच नाही तर
माझ्या अट्टल इर्षेतून
जन्म घेतो
एक महाकवी.

## शब्दाचा जादुगार

तू काय शब्दांचा जादुगार
की शब्दांचा संहारक
कृतांत, काळ?

मला कसे समजले असते
की, तुझ्या प्रश्नाचे
काहीही उत्तर
कधीच देता येणार नाही
अवचितपणे अशाप्रकारे
पाठ फिरवतील सगळे शब्द..........

विभूषिता, उत्कंठीता नायिकेप्रमाणे
धावत येत
ओठाच्या उंबरठ्यावर येऊन शब्द
एकाएकी उभे राहतील
थरथरतील, रडवेले होतील
पण स्वतःच्याच
निरर्थक लाजेमुळे
पूर्णपणे बदलून शेवटी
झाड किंवा दगड होतील !
आजपर्यंत तर मी
शब्दांच्या नानाविध चित्रित जाळ्यामध्ये
आकाशाला पकडू बघत होते
इच्छा झाली की परत
सोडून देत होते
पक्ष्यांप्रमाणे
शब्दांना उडवून देत होते.
अवकाशाच्या सीमेवर

माझ्या वेगवेगळ्या अनुभवांना
पाठवून देत होते.

तुझ्याकडून चालत आलेल्या प्रश्नांनी
माझ्या चेतनेच्या दारावर
ठक ठक केल्यानंतर
रटलेल्या शब्दांची अर्थहीनता
आणि त्या अर्थहिनतेला
लपवून ठेवण्यासाठी
पृथ्वीवरील सारे कौशल्य
माझ्या हाताला गवसले.

शब्दांच्या
अशा ह्या अस्सल मुकेपणाला
मी तरी कशी ओलांडू?
तुझ्या अधीर प्रश्नांना
सामोरी कशी जाऊ?

अरे शब्दांचा संहारक
माझा प्रेमी
माझा परमकाळ
माझी खूप इच्छा आहे आज
एक शब्द उच्चारायची
उरलेल्या आयुष्याच्या मोबदल्यात
जे असेल यथार्थ उत्तर
त्यानंतर आणखी काही
बोलणे आवश्यक नसेल
लाजेमुळे येणारे मरणही नसेल.
साऱ्या आयुष्यभर
सांगावे की न सांगावे
अशा कासावीस प्रेमाने
दिशाहीन माझ्या हृदयाचे
भोग सरतील अखेर.

## विनिमय

वेळ नाही.
तुच्छ्तेला कवटाळून
निरर्थक कोलाहलात बुडून
चकव्यात फसून
व्यतीत झाले माझे सगळे जीवन.

नकळत खांद्यावरून घसरला
निळा लाल पदर
नवीन रंगाने सजला.
हृदयाचा संगीत स्वर
उमटला त्यावेळी, आज
आकाश सारे
अंधारून येईल
असे वाटत असताना देखील
संध्याकाळ अजून तशीच आहे.......
आता वेळ नाही.

बोल
एखादा शब्द तरी बोल
बघ
एकदा तरी बघ
घे
नवतन अभिषेकाचे नीलकमळ
ज्याचा शाश्वत सुगंध
भिजवून टाकतो
माझा तळहात !

सारे काही सांगण्याची वेळ
जीवश्च–कंठश्च प्रेमाला
साद घालण्याची वेळ
जन्मोजन्मीची खंत
घालवण्याची वेळ
आत्ताच
उरलेल्या आनंद वेदनेचे
पाताळाश्रयी अश्रू
तयार व्हायची वेळ
ते ओघळण्याची ही वेळ.

बिचारा काळ
काही लपवून ठेवू शकत नाही म्हणून
संशय, अपयशाच्या काळोखीने
झाकून घेतो चेहेरा
किती झटदिशी आकाशाच्या मार्गावर
धुराच्या रेषेप्रमाणे
वेगाने जातो
जरा क्षणभर थांबावे हे
त्याच्या हातात नसते.

बघ बघ
उरलेले क्षण
फांदीवरच्या पिवळ्या पानागत
अस्थिर
डोंगर माथ्यावरील उन्हाच्या तिरपीगत
किती घाईघाईत
एखादा शब्दतरी बोलता यावा
म्हणून कंठ माझा
उत्कंठीत, अधीर.

आज जर
शब्दांचे अक्षय भांडार

एकदाच उघडले असते,
तर मी आज निवडून घेतला असता
अखेरचा म्हणून, एकच शब्द,.
उन्मुक्त पृथ्वीच्या छातीप्रमाणे
अनावृत्त माझी चेतना
समर्पित करेल,
अर्थपूर्ण
त्याचा अनंतकाळ.

## केंद्रबिंदूतच...........

वृत्ताकार मार्गात
फिरते आहे माझी सत्ता
जन्म...यौवन...वार्धक्य
मृत्यू...जन्म...यौवन
मी फेकून देते
माझ्या देहाला
निर्माल्यातील फुलाप्रमाणे
फेकते आणि परत घेते
पुन्हा पुन्हा.....
त्यामुळे माझा
आकार, आवेग, स्वप्न
ह्या सगळ्याचेच वैशिष्ठय ठरणे
अगदी निरर्थक.

प्रतीक्षा...प्राप्ती...शून्यता
शून्यता...प्रतीक्षा...प्राप्ती
डोळ्यातच
सर्व सत्तेचा सारांश
एकवटून
वाट बघत बसलेला
एखादा मुहूर्त
दुःख पदरात पडल्यावर
दिशा–दिशात व्यापलेल्या शून्यात
तुलाच हरवून बसणे
हाच तर माझा कर्मभोग.

सगळा काळ

अखंड वर्तमान होऊन
लांबला आहे.
वृत्ताकार मार्गावर
मी फिरते आहे
फिरतेच आहे.......

केंद्रबिंदूमधे कोण.......
क्षणोक्षणी जळतो
विझतो. पुन्हा जळतो.
तूच आहेस तिथे?
तूच का तो केंद्रबिंदू?
परिघापासून
एक निश्चित अंतर ठेऊन
जो नेहेमी स्थिर असतो.

## दादून आलेले इंद्रधनुष्य

पाऊस पडला, मुसळधार पाऊस
साऱ्या आकाशभर
ढगा ढगांवर उड्या मारीत
ज्वालेची रेघ आखत
विचित्र चित्रे चितारत
वीज नाचली.

घोडयाच्या टापा ऐकू येत होत्या
आकाशातून मातीवरून
हत्तीने सोंडेतून सोडल्याप्रमाणे
साऱ्या आकाशाने पाणी सोडले होते.
पावसाचे रहस्य
साऱ्या रानभर पसरून
धीर सोडून
कोसळत राहिले.

घोडयाच्या टापा थांबल्या
कुठला तो क्षण
दूर जणू आणखी दूरवर
निघून गेला.
हत्ती शांत झाला
क्लांत, शांत.
झाडाझुडूपांच्या मुळातून
पावसाच्या पाण्याचे पाट वाहिले.

ते असे पावसाचे पाणी

त्यात उठले असंख्य बुडबुडे
त्या बुडबुड्यांमध्ये
शेकडोनी
संचारत होती इंद्रधनुष्यांची छाया.

फांद्या–पानातून पाण्याची धार
अविरत
टपटप आवाजात बोलत होती
म्हणत होती
बघा बघा
कोणत्या धनुर्धारीनी
डोंगराच्या पार
टेकवून ठेवले आहे
त्याचे सप्तरंगी रत्नधनु
जोडून ठेवण्यासाठी
ह्या डोंगराला
त्या दूरच्या डोंगराबरोबर !

खरेच का हे इंद्रधनुष्य?
कशी ह्याची स्थिती !
अविरत पडणाऱ्या
अस्थिर अशा पावसाच्या थेंबावर
स्थिर होऊन हे राहिले आहे.
तुझ्यासारखे, अगदी
तुझ्यासारखेच राहिले आहे
सत्याला धरून.
क्षणात बदलणारे हे
स्थान, काळ व घटनामध्ये
अविचल स्थिर राहाते.
पुन्हा मायेप्रमाणे वेढून
मला बांधून ठेवते.
रंग आणि बेरंगाला
एकत्र करून

चेतनेच्या भूमीवर
आणखी गडद, दाट
स्पर्शक्षम
एक चित्र चितारा.

## ओढत नेता कोणीकडे

ओढत नेता कोणीकडे,
इकडे माझे घर–दार
आणि व्यवहार
दुर्लक्षित पडले आहे.
कुठल्या स्वप्नात रममाण होऊन
ओढून नेत आहात
सोडा माझा हात ——
तुमच्या स्वप्नातील धमनीत
वाहत असणारे रक्त
माझेही असू शकते.
खरे सांगा,
ही पृथ्वी ओलांडली की,
कोणत्या अवकाशाच्या सिंहासनावर
नेऊन बसवणार मला?

इथे तर
माझ्या हृदयाच्या
खोलवर प्रवाहात
अजस्त्र अश्रू गळतात तुझे
क्षणिक हाहाकार तू
चित्रमय धूळ,
काळाच्या कोणत्या बिंदूवर मी
भेदू तुला ——
भेटताक्षणीच मी दुभंगेन
त्याच मुहूर्तावर
होतील माझे तुकडे दोन.

परिचीत काळाच्या
कुठल्या एका बिंदूवर मग
तुझी गाठ पडणे
अशक्य
हे माहीत असूनही
मी कशी
घर–दार, मर्यादा
सारे काही सोडून
निघाले तुझ्याबरोबर !

दूर दरीच्या छातीवर
उगवलेल्या गवताप्रमाणे
माझ्या एक एक स्वप्नाची
रेघ आखून
जमिनीवर, मी त्यांची नावे लिहिते.
कोणी नसेल त्यावेळी
मग त्यांना गोंजारते,
जणू काही ती
सजीव होतील
माझ्या गोंजारण्यामुळे.

माझ्या देहाच्या
जास्त भावप्रवण
काही तारांमधून
स्वर उमटतात.
त्याचे तरंग डोलत राहतात
साऱ्या आसमंतात.
कधी सांग तो तरंग
पसरेल दिशादिशात
तुला स्पर्श करेल
किती पाणी किती अश्रू
किती किती
शब्दांचा वर्षाव झाल्यावर?

किती दिवस आणखी
बाराखडी नसलेल्या भाषेत
कविता मी करत राहणार?
का सांग बरे
युगानुयुगे
माझे मूळ
वृक्षाच्या मुळाशी
बांधुन ठेवीन
कशासाठी?
सगळे तुच्छ मानून
तुझ्या बरोबर
पाय बाहेर काढून
निघेन परत एकटीच
ओसाड शेतावर
वाळक्या गवताप्रमाणे थरथरेन –
स्वतःच्या रक्ताची
स्वतःच चव घेईन
परत तू
हात धरून बोलावलेस की,
पृथ्वी ओलांडून
बरोबर निघेन.

## शून्याची अधिश्वरी

सर्वात शेवटी लागणाऱ्या
गोष्टी पूर्ण करून
ते परत गेले.

सरत्या संध्याकाळसारखी मी –
त्या दिशेला एक हात हलवत
दुसऱ्या हाताने
झाडाझुडूपातून, मातीतून
गोळा करते स्वतःला

थोड्या वेळाने
अंबाड्यातून जास्वंद निसटेल
अंधारात चेहेरा दिसेनासा होईल
जेव्हा कोणीही नसेल.
सकाळ संध्याकाळ अधिरतेने
मला खोचून खोचून विचारतील
ते सगळे
प्रयोजनाने घडवलेले रक्तमांसाचे देह
की प्रेमाने परिपूर्ण माणसे?
मी काहीच बोलणार नाही.

कोणाच्या तरी डोळ्यात
मी बुडाले होते कधी तरी
स्वप्नातील झाडाच्या शेंड्यावर
झुलत असणाऱ्या कळीवरून
एक लाल फुलपाखरू
कधीच उडून गेले होते

माझ्या हृदयातून.

मी कुठली माती
कुठले पाणी, वारा आणि तेजाने
घडले आहे काय माहीत?
धुक्याच्या एका रेघेगत तर दिसते
कसा दिवस घालवते
रडते, हसते
कसलीही अक्षरे किंवा
आवाज नसलेल्या भाषेत
बोलत असते
कोणाला कळत नाही.

त्या सगळ्यांचा
मला फेकून देण्याचा विचार होता
निर्मनुष्य खोलीतल्या अंधाऱ्या कोपऱ्यात
मी कशी काय वाचले
काय माहिती
डोके शाबूत ठेवून कशी राहिले
देवालाच माहिती
मी कुठल्या
भरवशावर बोलले
स्वतःला शोधून सापडवलेली
मी विजयिनी
हात पुढे करा माझ्या दिशेनी.

घरट्याकडे परतणाऱ्या पक्षांनी
क्रॉस आखला आहे
आकाशामध्ये
काही सांडल्यागत
काही थरथरल्यागत
कोणत्या अजाण प्रदेशात
तरंग उठले

चोहीकडे पसरले
गवताने भरलेल्या
अंधारलेल्या फटीत
चमचमणारे पाणी थेंबभर.
मला तर आता चुपचाप
परतायला हवे
दीर्घश्वासात थरथरणाऱ्या
डोंगर आणि गुहेत,
माहीत आहे न !
मुकूट आणि हा थाट
इथेच ठेवून जाणार मी.

## उमललेले अभाग्य

तळहातावर रेखाटले आहे एक चित्र
हृदयामध्ये स्थिरावलेले
तुझे प्रतिबिंब.
साऱ्या देहावर पसरत जाते
तुझी सावली
मग दुरावा कुठला, कुठे आहे?

आज परतवून दिले भाग्याला
म्हणाले, तुझ्यापासून
वेगळे होऊन राहण्याची
वेळ आली आहे रे आता...
वाट अडवून बसलेल्या वेळेला इशारा केला
थांब जरा, भेटणार तर आहेसच
शेवटच्या क्षणी तरी येशीलच
मी मुळीसुद्धा
तक्रार करणार नाही.

पण असे हे दिवस–रात्र
उजेड–अंधार आज–उद्या ह्यात
नसलेल्या महान नश्वरतेला
आता मोजत बसू नको, जा ——
नव्या मिलनाच्या ह्या
अंकुरण्याच्या वेळी
सूर्य अभिसारी माझ्या
आत्म्यातून, देहातून,
माझ्या प्रत्येक रोमारोमातून
एकेक श्वेतपद्म

नीलपद्म, रक्तपदमच्या
पाकळ्या उमलल्या.
हृदयाच्या स्पंदनाप्रमाणे अविरत स्पंदने
इकडे तिकडे भुंग्यांचे गुंजन
सुगंधाने भरलेली माती
साऱ्या आकाशभर
हाक पसरली.
निःशब्द आणि न उमटलेली हाक
जाणण्यासाठी पंचप्राण आसुसले
कोण? कोण आहे?

अर्धीमुर्धी ओळख
अर्धामुर्धा विश्वास आणि प्रेम
द्वितीयेच्या चंद्राप्रमाणे
अर्धोन्मिलीत डोळे
अर्धस्फुटीत ओठावरचे एखादे गाणे
अर्धवट दिसणारी
एक मूर्ती
धरता धरता जिचे अर्धेअधिक
तुकडे तुकडे झाले आहेत.

ह्या पृथ्वीने विचारले
माझ्या अस्तित्वाला
एकांतात नेऊन विचारले
तू तर मूर्ख नाहीस
भाग्यापासून, काळापासून
मुक्त होऊन
मोठे होण्याची कला
कधीपासून शिकलीस?
खरोखरच का आजपासून
लांच्छन, अपमान,
जबरदस्तीपासून
मुक्ती मिळाली?

भाग्याला तुझा
दासानुदास का केलेस?
सगळ्या आक्षेपांपासून
बिचाऱ्या भाग्याला
आजपासून मुक्त केलेस?
काळाच्या सगळे काही
धूसर आणि नष्ट करण्याच्या
गुणापासून वाचलीस तू?

त्याकडे लक्ष नाही दिले
मला माहीत होते, प्रश्न विचारणारा
अजिबात समजू शकत नाही.
पण तुला मी ओळखते, मी भोगलंय.
आजपर्यंत जसे
त्याच्या रस्त्यावर रोजच्या उन्हात जे
नियमित भेटणे, आरडणे–ओरडणे,
पण माझ्यासारखा कधीही तो
चाचपडला नाही
कितीही थंडीत, कितीही अंधारात.

## कठोर बंधन

कसला हा उजेड
कशाचा हा प्रकाश
पसरला माझ्या राज्यात
कसा उगवला आत !
त्याच्या अपूर्व उगवण्याने
नखा–शिखात माझ्या
अनेक ज्योती उजळल्या.

कसे वर्णन करू मी
माझ्या रक्ताच्या कणाकणाचे
माझ्या एक एक कल्पनेच्या
रंग उधळण्याचे –
असंभव उज्वल अशा त्या
स्फुलिंगाची
विपुलता घेऊन
मोजून–मापून जगणाऱ्या ह्या जगात
कशी मी जगू?
कशी वावरू?

खरोखरीच का माझ्यापासून
दोन बोटे उंचावर
झुलते आहे आकाश
माझ्या अभिषेकाचे मंत्र
उच्चारते आहे.
माझी तेजोमय सत्ता
क्रमशः
माझ्या आत

वरच्या दिशेने सरकते आहे
दिशाहीन शून्यतेकडे ——

जेव्हा की आजूबाजूला
कसली ही भयंकर सावली !
सावली जी वाढत जाते
पायाखालून वाढत
घाट, जंगले, डोंगर
आणि वाळवंटातून निघते
वाळवंटात दाटून आलेली
पाऊस पडण्याची आशा
मोडून पडते,
डोंगराच्या पायथ्याची
श्वापदांच्या भीतीने भरलेली भूमी
थरारून उठते,
गवत आणि पानांचा
उज्वल हिरवा चेहेरा
काळा पडतो,
शेतात ठायी ठायी
साठलेले पाणी
डोळ्यांना दिपवणारे पाणी
फिके दिसायला लागते,
ही भयंकर सावली
नदीमधे, ओढयामधे
छोट्या छोट्या काचेसारख्या
लाटांना झाकून
सरकत जाते समुद्राच्या दिशेने
पूर्ण समुद्राला वेढून टाकून
स्वतःच्या उदंडतेने
घाबरवते
दिगंताला हात लावून
आकाशाच्या दिशेने
दिगंताला ओलांडते –

प्रकाशाच्या सगळ्या लाटा
उसळतात
जास्तीत जास्त आनंदाने
सापासारखी पुढे सरकणारी सावली
का बरे जीभ काढते ?
आतंक, भीतीने भारावलेली
मी विचारते
तुला उद्देशून
विचारते पृथ्वीला,
आकाशाला,
कोण चिरंजीवी
कोण सत्य
काय माझी स्वतःची ओळख
सांग ——
प्रकाश का सावली ?
माझ्या सत्तेच्या
प्रकाशमय मंडपात
ही सावली
का बरे इतका विरोध करते,
ओरडून उठते
विझत नाही
पेटत नाही —— !

कुठूनतरी उत्तर येते
कोमल कठोर स्वर
खरच का हा आकाशाहून उंच आहे !
का हा स्वर,
तुझा स्वर आहे ?

उज्वल रत्नजडीत
सिंहासनासीन
माझ्या प्रियतमा,

तूच असे हे का बोलतोस –
'अग ए प्रकाशाची सखी
तू काय फक्त प्रकाशाची,
अंधाराची भागीदार नाहीस ?'

हा प्रकाश
ही सावली
हे माझे दोन हात,
परिपूर्ण आलिंगन देण्यासाठी
फक्त तुलाच
वेढून राहू देत.

## नदी

अभिनव विस्मरण
विसरून गेले
स्वतःच्याच पोहोचण्याचे ठिकाण
आकाशाला, पर्वताला
अडकून न राहण्याचे
दिलेले वचन
विसरून गेले.

मला कसे समजले असते की,
तू इथेच उभा असशील
मूर्तिमंत समुद्र
उत्कट अभिप्सेचा
निळा सम्राट
किंवा संन्यास्यासारखा
दिसत असशील,
दिसत असशील विचलित, अधीर.
ओंजळ भरशील
पुन्हा भरकटशील,
रसरशीत ओठांसारख्या
पाण्याने भरलेल्या ओंजळीत
कोणाचे प्रतिबिंब बघून
स्वतःला विसरून जात असशील !

दुपार टळून गेली असेल
झाडा पानांवर, किनारी गवतावर
छाती माझी भिजत असेल
हळदीच्या पाण्याने

परतणारे सोनेरी ऊन जळत असेल
तुझ्या सोनेरी देहामधे !

मी परत विसरुन जाईन
स्वत:चीच ओळख
तुझ्याच इच्छेची
प्रतिध्वनी बनून
घडत जाईन
आणि मोडत जाईन !

एकदाच माझ्या स्वप्नात
आला होतास
जेव्हा मी
वैराग्याच्या दगडाआड
कित्येक जन्माच्या
अव्यक्त, अमूर्त वेदनेने
निस्तब्धपणे फुटून जाणार होते
ते स्वप्न फार जुने नाही
रोज नवे आहे,
तुझी तहान
रोजच नवीन आहे.
नदीचा प्रवाह शोधणे
आणि तुझा नदी पार करण्याचा संकल्प
अगदी नव्यासारखाच
वाटत होता.
मी काय विरूपा नदीची
निळी वेणी,
का महानदीची
खोलवर कूस
तुला हाक मारली –
कुठे आहे माझा अंधारा भोवरा
कुठे आहे प्रमत्त हिंस्त्रता
कुठे आहे माझी

प्रवाह ओलांडण्याची उत्कटता ?
माझ्या प्रवाहात फक्त प्रश्न !
प्रश्नांच्या लाटा झाल्या की,
तुझे अर्धवट मिटलेले डोळे
आतुर उदास ओठ
अनुराग – विरागाने बनलेल्या
तुझ्या पौरुष सीमेवर
डोके आपटत असत,
नवोदित चंद्र किरणांच्या
दाट धुक्यात
हरवून जाणारे
जड निश्वास
होते तुझे प्रत्युत्तर !

मी काही ऐकले नाही
त्या क्षणी
विनाश आणि मृत्यूचा
मुकूट घालून
अहंकारी झालेल्या आयुष्याकडे
पाठ फिरवली,
तुला हवे म्हणून
सत्तेच्या सर्वांशात
मी नाव झाले
नावाडीही झाले
जोराचा प्रवाहदेखील झाले,
आणि त्याच जोराच्या
प्रवाहाला ओलांडण्याचा
उपायदेखील झाले.

सारे अतीत
सारे अनागत
त्या एका क्षणात
मी सारे काही विसरले

कुठली माती, कुठली नाव,
कुठली नदी,
कुठे आहे नावाडी,
वाटले की, मी फक्त
साऱ्या आयुष्याची
ओतप्रोत भरलेली
एक उष्म कूस आहे,
मी बहुतेक एक ध्येय आहे,
तुझा संकल्प
पूर्ण करणारी
मी एक निश्चित दिशा आहे.

माहीत नसलेल्या, ऐकिवात नसलेल्या
कोणा एका नव्या प्रदेशाकडे
ओढली जात होते !
करोडो नक्षत्रांनी
एक दुसऱ्याचा हात धरून
मला वेढून टाकले होते.
क्षणोक्षणी
अंधार – उजेड
स्वतःच्या प्रभावाने
माझ्या सत्तेला
वश करत होते.

मग मी काय
सुंदर सुवास आहे
गाण्याची सुरेख लकेर आहे,
जी पसरली होती
साऱ्या आकाशभर
का, मी स्वतःला
न ओळखणारा
फक्त एक सेतू आहे
जो दोन्ही किनाऱ्यांना

जोडतो आहे !
विश्व ब्रह्मांडाची
सारी शून्यता जणू काही
एक थेंब बनून
माझ्या छातीवर
पाय ठेवता क्षणीच
अपूर्व प्रसन्नतेने
रक्ताने भरून जात होती !

तुझ्या साऱ्या इच्छा
तुझे संकल्प
पूर्ण झाल्यावर
मला पुन्हा एकदा
सरलेल्या उत्सवाप्रमाणे
दुप्पट शांत झालेल्या
ह्या शरीराला
ओढून
एकटेच अंधारात
पुढे जायला हवे !

जिथे तुझा स्वर
कधी कुजबुजल्या सारखा
ऐकू येईल
तर कधी
हाहाकार केल्यासारखा
माझ्या छातीला भेदून जाईल.

## पहाटेच्या वेळी

भल्या पहाटेच्या वेळी
कोणी मारली हाक
कोणाची ही जिवंत उपस्थिती
जोरदार वाऱ्याशी
एकाकार होऊन
माझ्या दारावर
ठक ठक करत होती?

माझ्या हृदयाच्या तारांवर
कुठल्या स्वरांचा झंकार?
माझी एकेक नस
थरथरत होती.
समुद्रदेखील अंधारात गर्जत होता
मला चोहीकडून वेढुन बसला होता
खोलवर, न संपणारा असा....
का सारे आकाशच
बरसेन बरसेन म्हणत
ढगांनी भरून गेले होते?

कोणत्या नसलेल्या
गाढ आकर्षणाने
मला घट्ट ओढून धरले होते.
मोकळ्या शेजेपाशी
कोणाचे श्वास खालीवर होत होते
कोणाच्या इंद्रजाल ओठातून
पहाटेच्या प्राजक्ताप्रमाणे

टप टप शब्द पडत होते ——
तुझे का
अर्धवट उगवलेल्या
आसन्न पहाटेचे ?
हजारो कमळांच्या पाकळ्यांसारखी बोटे
माझे रोम रोम भेदून टाकत होती.

## चंद्राचा प्रकाश

### 1. तलाव

केर–कचरा, चिखलाने भरलेला
तलाव आहे मी
काठाकाठाने
काट्याकुट्यांचा कचरा
गुडघाभर पाण्यात
उगवलेली पांढरी छोटी फुले,
बेडकांची छोटी पिल्ले,
गोगलगायी, शिंपले,
छोटे छोटे मासे.
कुतूहलाने नाचणारा वारादेखील
इतक्या सहजपणे
रोमांचित करू शकत नाही
माझी निःस्तब्धता

कधी मधी त्याच्यात
बेढंगपणे पाय टाकून
आपली सतर्क नजर
पाण्यावर टिकवून
फिरत राहतो एक बगळा.

पण दिशादिशात विखुरलेला
हा चंद्राचा प्रकाश
तू खाली का उतरवतोस?
झुरझुरणाऱ्या कापराच्या हाताने
गोंजारतोस माझे सर्वांग

कोणास ठाऊक
कोणत्या मायेनी !
नगण्य अशा माझ्या छातीवर
आखतोस
स्वच्छ सुललित
तुझेच प्रतिबिंब !

**2. कापूर बरसतो आहे.**

कापूर बरसतो आहे
देशोदेशीच्या माळावर
शेतांवर
वनावनात लावलेल्या झाडांवर
समुद्र आणि नदी
तरंगा – तरंगावर
बरसतो आहे कापूर
सुगंधाने त्याच्या
भिजून जात आहे
माझे सारे अस्तित्व.

मोकळ्या केसांवर
कपाळावर, ओठांवर,
डोळ्यावर बरसतो आहे.
की, मी बघू शकत नाही.
माझ्या हृदयात
होतो आहे हलक्या
कापराचा वर्षाव....
कोण तो गातो आहे
कोण्या दूर देशी
झाडाच्या सावलीत
पावसात अर्धा भिजतो आहे.

काय रहस्य दाटून आले
चोहीकडून –
शब्द पसरवणारे
हे कोणाचे गीत आहे
बासरीतून उमटणारा
कोणाचा हा स्वर
तुझा तर नव्हे ?

### 3. मधुकुंभ

पूर्व दिशा
अंधाराने त्याच्या निराकार हातात
उचलला आहे मधुकुंभ !
मधु झिरपतो आहे
ओघळतो आहे थेंब थेंब
पानांवर,
पानांवरून मातीवर,
अखंड पडतो आहे.
भिजवतो सारे चराचर
भिजते आहे माझे घर, माझे आंगण.
मधाच्या रंगाची साडी माझी ओलीचिंब
ओलाचिंब माझा आनंद, माझी वेदना
सारी रात्र झिरपत असेल
मधाची धार,
संपत असेल
मधूर सुंदर काळ.
चुपचाप पृथ्वीचे कूस बदलणे
श्वासाने झाडांची पाने हलवणे
ऐकू येत असेल.
ऐकू येत नसतील फक्त
निःस्तब्ध असे पावलांचे आवाज.
आमच्या अस्थिर आयुष्याचे.

## शिंपला

खाऱ्या पाण्याच्या खोल साम्राज्यात
तिमीमासा व त्यापेक्षा मोठया तिमीलिंगाच्या
वासलेल्या 'आ' समोर
लाचार लज्जीत
घसटत घसटत
फिरत रहाणे
हेच माझे प्रारब्ध होते.

काळाची ओळख लक्षात रहात नाही.
दर्याच्या वर कुठेतरी
कधी कधी
टिमटिमणारी चांदणी उगवते,
लाखो चांदण्यातून
ही एकच चांदणी
का माझ्याकडे बघत राहते,
का मी तिला अशीच
आपली समजते,
मनातील सगळी निर्वाक पूजा
तिलाच समर्पित करते.

सप्त पाताळ भेदून
एक हाक ऐकू येते
चल ऊठ
आकाशाकडे बघ दृ
माझ्यात एक वीज चमकते
तळहातापेक्षाही छोटया
तुच्छ शरीरातील

अभ्यंतर जागे होते
माझे ओठ उघडतात.....

खूप दूरवरून
आकाशातून उतरून येते
काय, ते माहीत नाही !
अपूर्व, सुंदर
रसाळ
थेंबभर सृजनाची कल्पना ?
शून्यदेखील हलते
द्युलोक भूलोक
हसायला लागतात
कोणत्या ललित ॐकाराने
सारा समुद्र
डोलू लागतो !

अगदी आत्मीय असा
अलौकिक पावसाचा एक थेंब
येऊन पडतो
माझ्या विलग ओठावर
रोमांचाने हिरव्या अरण्याच्या कुशीत
त्या क्षणी
माझे नवयौवन
विस्तारीत होते
आणि पुढच्याच क्षणी
गर्भात आकार घेते.

## अनाधिकार

1.

माझा हेमवर्णी देह
आकाशातून उतरणारा
रंगाचा प्रवाह
तुझा स्नेह
सगळे जर सत्य
मग ही भीती कशाची?

अर्धा स्नेह
अर्धे भय
फुलून येणारे माझे रोम रोम
कोणत्या नव्या रहस्याच्या दोरीने
बांधून ठेवते
पुन्हा सोडून देते --
जर आपल्यामधे
आणखी काही नाही
तू आणि मी
दुसरे कोणी नाही
काही नाही
मग मी कोणाला
दिवसरात्र घाबरते
ह्या नग्न भयाचे
धुके, येते तरी कुठून
माझे हृदय
केस, चेहेरा, कटीप्रदेश
सगळे काही जाते भिजून.

2.

ते भय माझ्या समोर उभे राहते
तू नसतानाचे
ते भयंकर दिवस
ज्यावेळी
चंद्र, सूर्य, पाऊस आणि वारा
जात होते स्वतःच्या वाटेने
मी घसटत जात होते
असमाप्त शून्यतेकडे बघत
मी नजर फिरवून घेते
विजेच्या चमकण्याकडे
आणि इंद्रधनुष्याकडे
मी बघत नाही.
घोंघावणाऱ्या वाऱ्याकडे
हात नेत नाही.
आशेच्या थेंबभर तेजाने
मला बोलावले तरी
तोंड लपवून सांगते
नाही .......

3.

मी तुझ्या कुशीत असताना
काही नसल्याची घट्ट जाणीव
ओरडून उठते .....
क्षितीजावर
कोणाचा तरी अस्पष्ट हात
शून्यात हलवून
सांगतो
"नाही" ....

हरवून बसण्याची भीती
ना हरण्याची भीती
कुठून तरी धावत येते.
चिखलाने भरलेल्या ह्या जगातून
रक्तमय राग
अहंकार
तहानेने व्याकुळलेला माझा चित्कार
बाहेर पडतो.
म्हणजे मला काय
नश्वरतेकडून
सर्वाधिकार हवा आहे?

4.

तर्कहीन
अकारण भीतीशी
मी कशी लढू
असफल इतिहासाच्या
क्रमाला मी कशी तोडू !
भीतीने जवळ जवळ निष्प्राण
माझ्या देहातून, चेतनेतून
सगळा आवेग एकवटून
मी तुला घट्ट धरते
आणखी मोठा दंश करून
मिठीत घेते.
तुझ्या चंदनाच्या झाडासमान
देहाला
नागिणीप्रमाणे
कवटाळून बसते .....
आपली अवस्थिती
विसरायची आहे मला
विसरायचा प्रयत्न करेन मी

सगळी अपूर्णता,
अयोग्यता,
पण तेच सगळे
जास्त जास्त आठवत राहते,
म्हणजे मी काय
वाळूच्या रंगाची
वाळूने बनलेल्या माझ्या बाहुपाशात
निराधार प्रियतम
तुलाच
घट्ट धरून ठेवण्यासाठी
का प्राणाची बाजी लावते?

कोणाचा स्वर कोणाची सावली
कोण कोणाचा निरोप घेई
कोण कोणापासून दूर जाई
पारा गेलेल्या आरशातील
धूसर प्रतिबिंबागत
कधी
कधी भग्न महालातल्या
तुटक प्रतिध्वनीगत
ऐकू येतो
दिसतो ..... ऐकू येतो.

हा कसल्या रहस्याचा घेरा आहे !
तुझ्यापासून मला वेगळे
राहू देत नाही
पण तुझ्या
क्षणिक सुंदर शरीराशी
लगटून असताना
मला ओढून नेते .....
विवस्त्र दिशेला
झळाळून उठणाऱ्या
सर्वोत्तम आकारहिनतेकडे

खुण करते.
मी अभिभूतपणे पाहते
तू होतोस माती
होतोस आकाश
तूच पुन्हा होतोस
पाणी आणि अनल
रूप आणि सुवास.

अगदी त्याचवेळी
माझ्या रक्तात जन्म घेतो
एक अनुभव
त्याला देह नाही
विवशता नाही
काही म्हणजे काही मागणेदेखील नाही
त्या अनुभवाने
अभिषिक्त आवेग माझा
दूर असलेल्या तुझ्या सान्निध्याला
ओढून धरतो
परत अनश्वर
तुझ्या शुन्यतेची
आराधना करतो.

## पळून गेलेला

तू परतणार नाहीस
माझ्या डोळ्यात
तू पाहू शकणार नाहीस
तुझ्या येण्याच्या वाटेवर
जिथे
दिवा बनून जळत असे कधी

पुराणे, इतिहास, समाज
ओळखुन असतात
पळून जाणाऱ्याच्या रितीभाती
'निरोप' घेतला नाहीस
आकाशात
हरवलेल्या चांदणीसारखा,
नदीत
हरवलेल्या चांदणीच्या
हरवलेल्या प्रतिबिंबासारखा
अदृष्य झालास.
वाटले होते बहुतेक
तोरणात सजवलेल्या
फुलाच्या हारासारखी
माझी आशा
टवटवीत दिसता दिसता
कोमेजून जाईल क्रमशः

पण
पेटलेल्या वणव्याच्या माळेसारखे
तुझे हृदय

आणि सगळ्या चाटूकार
शब्दांच्या आड लपलेला
तुझा बाष्परुद्ध स्वर
किती आहे मधुमय.
,
घो घो वाहणारा वारा
शुन्यतेला टक्कर देतो
हृदय कोणाचा अट्टाहास
मोडून पाडते
श्वास थेब थेंब रक्तासारखे
थिजून जातात
जड पापण्यांवर...

तू काय
जवळपास लपलेले पोर
हाक मारल्यावर
तुझ्याकडून उत्तर मिळत नाही !
का तू कोणी
वेगळा विधाता?
जो
सृष्टी बरोबर
प्रलयाला एकजीव करतो?
का सृजनावेळची
खूप व्याकुळता तुझी
संहाराच्या वेळी
नाहीशी होते?
निःशब्दपणे मोडून पडतात
झाडे–वृक्ष, पहाड
आकाश कोसळते
वसुधेवर
एकाकी.
कोणी एकटाच कोणास ठाऊक
एकसारखा शोधत राहतो

सावलीला पकडण्यासाठी
धुक्यात पोहत राहतो.

देण्या–घेण्याच्या संधीकाळात
लोभाच्या बलीवेदीवर अधीर,
कोण कुठून पळतो?
घरातून का गुहेतून
सत्यातून का स्मृतीतून
सुटका मागतो
प्रेमातून का फासातून?
तू तर पळून जातोस
स्वतःपासून
सुटका मागतोस
स्वतःच्या सृष्टीकडून
इतिहासाकडून.

हे पळून जाणाऱ्या
तू कोठेही राहा
युद्ध भूमीवर राहा
वा सिंहासनावर
किंवा दुसऱ्या कोणा स्त्रीच्या बाहुपाशात,
तुझ्या वाटेवर
सतत पुष्पवृष्टी होवो.

## प्रकाशमय अंधार

पर्वताची दाट सावली
घेरून आल्यावर
पंखाची उब
हलकेच गेली तरी
जवळपास
कोणी म्हणजे कोणी नसताना
आजूबाजूला कोण दिसतो?

एक एक करत
तुटून पडतात
त्याचे अवयव, त्याचे तोंड
विरघळून जातो त्याचा स्वर
त्याचे असणे
खरोखरच मी ओळखू शकत नाही
निर्लेप साधेपणा
तूच आहेस का तो
वज्र बनून, निस्तब्धता बनून
ओढयाची खळाळता बनून
रक्ताचा प्रवाह बनून, छंद बनून
परत येतोस माझ्याकडे !

कोणास ठाऊक कोण
हात पुढे करतो, थांबतो
पाऊस वा दवात
ओलेचिंब होऊन
पृथ्वीला
झोपेतून जागे करतो

सांगतो
बरेच काही तिच्या कानात सांगतो......

स्वच्छ न केलेल्या गटारासारखी
घाण येऊ लागली शरीराची
घाण येऊ लागली
विनाअट समर्पणाची
पुरुषाकार शपथेची
लोकाचाराची
माणूसपणाच्या अहंकाराची
ही घाण
आता व्यापून टाकेल
सारा परिवेश
माझा वर्तमान !

तरीपण
दरवाजा उघडा ठेवते मी
पडदा बाजूला सारते
मोकळी करते रात्रीला
तिच्या ओळखीपासून..
दूरवर नजर टाकते
जवळ जवळ
असंभवाकडे
कदाचित काहीतरी चमकेल समोर
सगळ्यात शेवटच्या
स्वप्नातील
प्रकाशमय अंधारामधे.

## खरे खोटे काही समजत नाही

खरे खोटे काही समजत नाही

अर्ध्या स्वप्नातून जागी होते
अहंकाराला चाचपून बघते
हाताला ओले लागते
साऱ्या बोटांना रक्त लागलेले असते.

नाना मरणास्त्रांनी सजलेल्या
अपरिचित घटनांच्या
आक्रोशाला
थांबवते डाव्या हाताने.
मातीखालच्या मुळांसारखी
मिठीत बांधली जाते
पण
'माझी माती' असे
मातीला म्हणू शकत नाही

किती प्रश्न
खऱ्या खोटयाचे
संकटात थरथरणे
'दे' 'दे' असा चित्कार करणे
मी तर राजकन्या
उज्वल लेखणीच्या तलवारीने
कापून काढते निरवतेला
एक एक पदर सोडवत
वाटते आतून काढून घेईन उत्तर.
छोटयाशा शब्दांचे

न संपणारे भांडार
कुठे असते? किती खोलवर?

साडीतून झटकते
सगळी चांदण्यांची फुले
वेणी सोडून
मोकळा करते निर्झर
बांगडया काढून साडी सोडून
फेकून देते
उंदरांनी पोखरलेल्या मातीवर...
वेळेला
ओरडून ओरडून सांगते
'जा' कुरतडून घेऊन जा
सगळेच्या सगळे धान्य
चेहेऱ्याच्या तजेलतेकडून
मी आता
उत्तर शोधते आहे
दिवसभर रात्रभर
शून्याच्या कानाकोपऱ्यात शोधते
आकाशगंगा वाकवते
हात घालते
ढगाच्या खिशात
त्याला बोलावते
ये, हातात ये ——
काहीतरी सांगायचे
म्हणून
भरून आलेले आकाश
कोसळायला लागते ——

## शून्य प्रतिमा

खिडकीतून मान उंचावून
बघणाऱ्या झाडा–झुडपांना
त्यादिवशी
खेकसून म्हणाले
व्हा बाजूला, काय बघताय?
मोठ्या कष्टाने मी रात्र घालवते आहे
छातीवर दगड ठेवून गुदमरते आहे
जर तू
पाना फांदयांच्या जाळ्यामधे
अडकवून ठेवला असतास
थोडा वारा?

का? काय त्रास आहे तुला?
आता
मोकळेपणी सांगेन मी
माहीत नाही कोणी लिहिल्या
दोन ओळी
माझ्या पापण्यांवर.
जर मीच घडवेन
एक सजीव प्रतिमा
रिकाम्या गर्भाशयातून
सुरस काढून
देह देऊन, त्वचा देऊन
शब्दांची गाढ झोप मोडून
त्यांना जिवंत करून
असंख्य विडंबना विणून
मीच तयार करेन सुवर्णसंधी

पायाखालून सरकणाऱ्या वाळूत
स्वतःचेच रक्त सांडत राहीन

छातीवर एक मोठा आरसा धरून
लाखो भावमय प्रतिबिंबांना साठवून
इतका लांब रस्ता चालत राहीन ———

## प्रगाढ

नाते
अतिशय मखमली पोशाख घालते.
कावळ्याच्या छत्र्या उगवलेल्या लाकडाचे
मुसळ गळ्यात झुलत असते.
पिंजऱ्यात चालू राहते
उंदराची तडफड...

नैवेद्य
इकडे तिकडे विखुरलेला असतो
निःश्वास मातीला भेदतात
हात पुढे करून
घसटत घसटत गेले तरी
मी पोहोचू शकत नाही
देवाच्या पायापाशी,
बहुतेक
कुठेच जाऊन पोहोचत नाही
कधी कुठल्या स्वप्नामधे

अभिसाराचा चाकू
सारी रात्र
चिरत असतो निरवतेला
विक्राळ पुरुषाच्या संभोगात
शरीर जळत राहते
आयुष्याबरोबर अश्रू
टपटप गळत होते तेव्हा
सूर्यास्तापासून सुर्योदयापर्यंत
मी हात उचलून धरते

खऱ्या खोटयाच्या सीमेवर
,

क्वचित कधी
दूर कुठूनतरी
उडून येतो
सरस शब्दांचा थवा
आपले पंख मिटून
ओठ, डोळे, कान, छातीवर
झपकन खाली येतो
आणि माझे सारे अंग
लाल पडते.
ओंजळी भरभरून
आगीत मी स्नेह ओतते
ओठ कापत नाहीत, उघडत नाहीत.
वाळूच्या ढिगावर
भरलेली घागर फुटून जाते.

प्रतारणेचे
अनेक हात
लाल, निळे, पांढरे आणि अनेक
स्वच्छ सरोवरातील भोवऱ्यांप्रमाणे
थोडीशी ओळख असलेले
दोन डोळे
उघडे आहेत
सकाळच्या कुठल्या कोपऱ्यामधे?

आयुष्यातून कणभर वाळू निसटली
तर समुद्र कोसळून पडतो
डोंगराच्या पलीकडून
उड्या मारत येते थंड हवा
मला मिठीत घेते
घट्ट आवळून धरते
धूसर ढगाच्या दीप–दाणीवर

दिवा लावून ठेव
म्हणतोस
आत्तापासूनच?

## उद्या सकाळी

पाण्यावर पाणी
खळाळत येते.
आकाशात
ना ऊन आहे, ना ढग, ना वादळ
कशाची म्हणजे कशाचीच
काही सूचना नाही,

मी जर नाव
मीच जर नावाडीही
मी जर फक्त साधन आहे,
ध्येयाचे.
उद्या
ध्येयपथ जर पुसला गेला
उद्याची सकाळ
माझ्या स्वप्नातून, कल्पनेतून,
साधनेतून
खरेच वेगळी झाली
तर मी तिला
भेटणार तरी कशी?

सकाळी
सूर्य वर आला असेल, नसेल
सारी रात्र
पाण्याच्या अंगावर
थय थय नाचणारा
नागडा नामर्द

नावेच्या आडोशाला
जर लपून बसला असेल
जर स्वप्नांची कोवळी मुळे
अडकतील वाळूच्या ढिगामधे
डोळ्याच्या रंगीत शिंपल्यातून
गळून पडली असेल कल्पना
कोण जाणे किती पतंग
शहाण्यासारखी गुणगुण करीत
आकाश कंपवून, बाजार संपवून
बगीच्यात परत येत असतील.

वाळवीने खाल्लेल्या
आशेच्या पेटाऱ्यातून
सोसाटयाचा वारा सुटला.
जवाहिरांच्या
बोटांच्या फटीतून निसटून
धुळीत लोळत असेल माझा
शब्दांनी जडवलेला रत्नहार.

एखादी चांदणी उडी मारून
पाण्यात भिजून विरघळून जाईल
दिग् वलयामध्ये एखादा पक्षी
एकटाच फिरत राहील,
कोणत्या किनाऱ्याकडून माहीत नाही
ऐकू येईल
सगळे काही हरवल्यागत हाक
माझे नाव तर कधीच पुसले गेले असेल
वल्हे झाडून पुसून
नेले असेल पाण्याच्या अंगावरून
पण मी मात्र उभी असेन अशीच.
संगमरवरी पंख पसरून
लाटांवर नाव
तरंगत असेल

जसा काही राजहंसच !

उद्याच्या सकाळीबरोबर
मी जशी पण भेटेन
राजराणी
अथवा भिकारणीच्या वेशामधे
मला मात्र द्यावेच लागेल
जे देऊ शकले नाही मी तुला
उद्या सकाळी.

## जायला हवे

मधुरतम अपयश
काल मला बोलावून गेले ———

मातीतून वर आला आहे
कोयीतून एक कोंब
डोकावतो आहे
क्षणिक सुंदर प्रतीश्रुतीच्या
स्वरांपासून एक मूर्ती
घडवली जात असतानाच
अचानक तिचे तुकडे तुकडे होतात
अणू अणू स्वराचा
पोहतो आहे, तरंगतो आहे, बुडतो आहे
माझ्या नाचणाऱ्या रक्तप्रवाहात.

अन्यमनस्क होणे
आणि अधीर न होणे
ह्याला मी हास्यास्पद केले आहे.
माहीत नाही कितीवेळा
मी मध चाखला आहे
रसरशीत हातातून.
वेगळे करू शकले नाही सुगंधाला
'माया' 'माया' म्हणून किंचाळले
कधी आकाशाला तर
कधी काळाला टेकून बसत
सारी रात्र मी घालवली आहे.

त्याचसाठी
हो – नाही अपेक्षित आहे
जाणे – न जाणे माझ्यासाठी एकच आहे
क्षणात
चौदा भुवनात विखुरलेली मी
दुसऱ्याच क्षणाला
एकत्र येते
एकुलत्या एक स्पंदनात...

तरीही
त्यांनी बोलावल्यावर
पुसली जाते ती वाट
कालपर्यंत जी मी
पार करून आले होते.
शनी–चंद्र विषयोगात अडकलेली
माझी भाग्यरेषा
पुसून जाते.
तथाकथित यशाचा मुकूट
पडून जातो.

काय उत्तर देईन, विचारतोस?
वेळ कुठे आहे?
हाडांच्या मळक्या चांदीच्या दागिन्यांना
रफू केलेल्या रक्त–मांसाच्या साडीला
चमकवण्यासाठी आणि नेसण्यासाठीदेखील
वेळ नाही
मला जायला हवे, आत्ता.

## पूर्णता

वितभर काळाला पूर्णता द्यावी म्हणून
सूर्य, चंद्र, आकाश, माती,
झाडे–वेली, नदी, वारा
सगळ्यांना माझ्या मापातून
मी वजा केले ———

स्वप्नातील भ्रुणाला
त्याचे शेवटचे स्पंदन
थांबण्यापूर्वी
उचलून घेतले आहे बोटावर
मागच्या अंगणातील पिंपळाच्या
सगळ्यात उंच फांदीवर
पिनेने अडकवून ठेवल्या आहेत
दोन चार चांदण्या
एकाच शब्दाने असला तरी
घेतला आहे 'निरोप'
दूर आले तुझ्यापासून.....

सुगोल पूर्णतेला
शोधता शोधता
उचलून आणली कुठूनतरी
एक चव
संतापाच्या ओझ्याने
वाकलेल्या फांद्यांना
पॉलीश करून ढकलून दिले
दूर दूर आकाशात

उड्डाणासाठी.

प्रत्येक माणसाला
एकाच साच्यात बांधून टाकले
माझ्या स्वतःच्याच साच्यात.

अजिबात आकार नसलेल्या
वर्णमालेला घेऊन
सजवले कवितेला.
किती तोंड फुगवून बसले
किती रुसले
दवासारखी
मातीत मिसळून गेले
तिच्या सुपीकतेला खुरपले
शब्दांनी मूळ धरले की नाही
त्याचा शोध घेत राहिले.

शाईच्या लेखणीने
स्वर्गाच्या पापण्यांवर
करून आले सही !
काही मिळाले का नाही
त्याचा हिशेब ठेवला नाही.

काहीतरी मला पाहिजे हे नक्की
नाही, वेगळा काही
विचार करू नका
कल्पनाही करू नका
सगोल परिपूर्णता
इथे कुठेच नाही.

जर मला काही हवे आहे
जर काही मिळवले आहे
थोडया थोडया चवीमधे

निस्तब्ध कवितांशामधे
स्वप्नातील भ्रुणाच्या सजीवतेमधे
मीच
ते भरत चालले आहे.

## स्वप्नाशिवाय

कोकिळा दिसत नाही
पण तिची कुहू कुहू
कशी काय कानावर पडली
कोणास ठाऊक
आगगाडीची झुक झुक थकावटीला
पळवून लावते
आणि मी तर
स्वतःला लपवून घेते.

पुसून टाकले अस्तित्व
ढगांवर नाव लिहिले होते
ढग वितळून नदीत वाहून गेले.

खिडकीवर कोणी काढली आहेत
झाडे, पाने पर्वत
मोठा वाडा
तुझी आठवण
समोर येऊन उभी राहते
अगदी तुझ्यासारखाच
आवेश घेऊन.
तू आठवण
ना वर्तमान
ना त्रिकाळाचे आश्वासन
मला काही समजत नाही.

प्रश्न विचारणाऱ्या बोटाने

अंधाराचा पदर मी उचलून धरते
जेव्हा सगळे झोपी जातात
कोणा अजाण देशाचा वारा
माझी वाट अडवतो
अंथरूणाशी झटपट करत
शोधत राहते मी
कधी मिळते, हरवते, सापडते.
वारंवार
ध्रुव ताऱ्याला हात लावून येते.

भुवयांच्या मधली एक रेघ
भाग्य माझे
त्याच्या थंड कठोर आक्रोशाने
अभिमंत्रित धूळ फेकून
जणू मला किडा बनवले आहे ——
एका साध्या धाग्याच्या तुकडयाने
बांधून टाकले
माझे हात–पाय
जणू काही
मी आज नाही
आणि आधी कधीच नव्हते ——

ह्या गर्वाचे मला हसू येते
माझ्या पायाखाली तर
गवत आहे, पाणी आहे.
मी कशी नसणार?
माझ्या साडीच्या निऱ्यांमधे
लाटा आहेत महानदीच्या
माझ्या गळ्यातील माळेत
एक एक चांदणी आहे
माझ्या गाण्यात
प्रेम आहे, अश्रू आहेत,
मग मी दिसणार नाही कशी?

किती धावपळ असते
प्रतिष्ठेच्या नावाखाली
मला हसायला येते.....
मी अशी
लपून नाहीशी झाल्यावर
ध्रुव ताऱ्याला शिऊ शकते
झोपेशिवाय, स्वप्नाशिवाय.

## तुला मिळवायचे म्हणजे

ते म्हणतात
मी मिळवले आहे
खरोखरच
मी मिळवले आहे का तुला?
तुला मिळवायचे म्हणजे
पलीकडच्या किनारी जाणे
शरीराला
झाकून घ्यायचे रहस्याने
आत्म्यातून पूसून टाकायचे
सारे धुके,
मोगऱ्याच्या गजऱ्याने सजवायचे
अंतःस्थळ.

खरोखरीच
मी ओलांडल्या आहेत सगळ्या पायऱ्या
एक एक करून सहजपणे
पुढची का वरची
उतरलेदेखील आहे
मागची का खालची
समजू शकले नाही
समजण्याचा प्रयत्नही केला नाही
कारण
काही संशय कुठला
विश्वास हाच विश्वास
कशी भकासपणे उतरली
माझी दुपार.

तुला जरासा हात लावावा म्हणून
कितीतरी चौकात
पाय दुमडून उभी राहिले.
सहन केला धिक्कार
सहन केल्या जखमा.
आत्मा आणि शरीर दोन्हीही
प्रचंड आगीत जळत असताना
जिवंत ठेवले स्वतःला.

साऱ्या आकाशाला
व्यापून टाकले एकटीने
ढगांना नखांनी ओरबाडले
ताऱ्याचे पदक करून
स्वतः मात्र झुलत राहिले
अर्थाच्या गळ्यामधे.
अर्थाच्या गळ्यात
लटकणे म्हणजे
स्वप्न बघणे
स्वप्नांना खरे मानणे
अर्धवट उजाडलेल्या पहाटेला
स्वतःच्या
दुःखाने दाटून आलेल्या छातीला
गोंजारणे.
काय बघून
काय वाचून कोणास ठाऊक
काय काय ते सगळे ऐकून
त्यांनी हे मानले आहे की,
मी तुला मिळवले आहे.

कोणाला माहीत असू दे वा नसू दे
मला माहीत आहे की,
तुला मिळवणे म्हणजे
आनंदाने गदगदणे

शब्द आणि अर्थाला हरवून बसणे
रक्ताने भरलेल्या हृदयाला
रस्त्यावर फेकून देणे.
तुला मिळवणे म्हणजे
एकदम चुपचाप
तोंड घट्ट मिटणे.

## कोण आहे त्या किनारी

त्या किनारी कोण आहे?
अंधाराच्या ओझ्याने वाकलेला
वारा घसटतो आहे
इथे श्वास घेणे कठीण आहे.

जोरदार प्रवाह
कसा माझ्या छातीवर
आतपर्यंत आघात करतो आहे
मारतो, कापतो
सगळीकडे रक्तच रक्त
माझ्या हातापायावरून वाहत आहे.

मातीवर मोडून पडले
कवीचे स्वप्न
धूळ—धूसर भयंकर
पण धुळीत अजूनही आहे तेज ———
म्हणतोस नं !
धुळीमधे
एक छोटा कण
फुलला आहे, सजीवपणे झगमगतो आहे
ते तेज माझे असे म्हणतोस !
असेलही माझे.......

त्या तेजाने
जवळ जवळ दहा वर्षापूर्वी
मेलेला माझा प्रेमिक

अचानक उठून बसेल?
उकडलेल्या अंड्याच्या
अर्ध्या भागासारख्या त्याच्या डोळ्यात
विस्फारली असतील अनेक स्वप्ने ———

त्या तेजाने
लाल पडतील झाडे–झुडपे
वितळून, वाहून जातील घाट–रस्ते
कडवट हसू सगळीकडे पसरेल
आकाशाच्या ह्या टोकापासून
त्या टोकापर्यंत?

त्या तेजाने
विशुद्ध अहंकार
नाहीसा होईल का ?
मी हात पुढे करेन
कोण आहे त्या किनारी ?
धप्प ओला अंधार
समजत नाही काही.

## दीपगृहाच्या आत

आठवणींना शरीर असते तर
लागलीच मी त्याला ढकलून
बाजूला केले असते
माझ्या समोरून.

समोर तो उभा ठाकतो
विभोर नजरेची दुग्धधार
रसमय सहस्रधार
वाहवून, बुडवून टाकते
माझे अस्तित्व.

अतीत, वर्तमान, भविष्य
कोणाची काही
ओळख नसते.
फक्त प्रवाह
किती विसंवाद, रक्तपात
हाहाकार ——
फुलवनाच्या आंदोलनात
उत्कंठापूर्ण संघर्ष
वाळलेल्या मुळांशी
हसत हसत केलेल्या
नफा–नुकसानीच्या कथा
किती नावे, किती आडंबर
खोट्या स्तुतीच्या सिंहासनावर
माझे महाराणीपण
कशाचे काही महत्व नसते.
फक्त

त्याच दृष्टीच्या
पातळ रसधारेनी
मूर्च्छित मी
शुद्ध हरवून बसते.

समय बनतो
दगडाची चिमणी
माती खाली
मुळे थरारतात
पर्वताच्या पायथ्याशी
गवतावर पडलेल्या
सकाळच्या दवासारखी
टळ टळ होते पृथ्वी ———
मी जगते–मरते
पुन्हा जन्म घेते
कितीवेळा माहीत नाही ———
कुठला पाऊस आणि कुठले अश्रू
शब्दांच्या प्रवाहात
पोहत राहते, मी पोहत राहते.

## सही

निद्रा किंवा मरण
कोणता सोपान आहे हा अभ्यंतराचा
का एका क्षणात
बरोबरीने
हे भोग–अभोग आहेत
जीवन आणि मृत्यूचे?

ह्या क्षणाला मी
पाताळात आहे का स्वर्गात आहे
एका क्षणात विजेच्या गतीने
प्रकाशाच्या किरणासारखी
पसरली जाते ———
कमळ देठाच्या गाभ्यातील
मी एक कंपन आहे,
आकाशात वज्र बनून बोलावते
गुहेच्या आत पसरलेला
मी अंधार आहे,
शिखरातून प्रकाशाचा
झरा बनून मी बाहेर पडते.

कुठे आहे मी, विचारू नका
कुठे आहे मी, त्याची निर्दिष्टता
काही नाही ———

सुख–दुःख एकाच बिंदूवर
एक झाल्यावर
देह शून्य झाल्यावर

हवेलादेखील शरीर मिळाल्यावर
अस्त–व्यस्त नदी
मुखाशीच तटस्थ झाली तर
कोणताही आघात कधी
स्विकृत नाही झाला तर
तू मला पूर्णपणे बांधून ठेव
पूर्णपणे मुक्त केल्यावर
निर्दिष्टता हरवून जाते,
परम मुकेपण दाटून येते.
उच्चारण हरवून जाते.
चाफ्याच्या फुलाच्या परागाने भरलेल्या
तुझ्या छातीचा स्वर इथे वाजतो.
रोग, वेदना, जखमांच्या
आवर्तामधे
कवितेच्या पंक्ती गुणगुणतात.
बोलतात.
नवे नवे पवित्र अर्थ
माझ्या रक्त कणांवर लिहितात.
परत तुझ्या छातीच्या
घरट्यात मी
एक शुभ्र चिमणी
पेंगत पडले की,
तू आकाशगंगा बनतोस.
आकाशाच्या ह्या टोकापासून
त्या टोकापर्यंत
जोडून दिल्यावर
दवाचे डोळे असलेली मी
चिकटून राहते
पाकळीच्या काठाला.
मी परत बदलते
शून्य बनते .....
शून्यातून देह मिळवते.
कालसर्पाकडून डसले जाणे

हा धर्म नाही ह्या शरीराचा
हे शरीर
नक्षत्राच्या बोटाच्या
टोकाएवढ्या प्रकाशासारखे
पुष्पवृष्टी सारखे
पसरते ह्या वसुधेवर.

रत्नमय माझ्या गर्भाच्या
अनेक इच्छा, अनेक संकल्प
एकच तेज बनून
जीवन मिळाल्यावर
स्वतःच ते जीवन बनून
मी पुन्हा त्या जीवनाची
जननी झाल्यावर,
ओंजळभर मातीच्या पोटात
कापलेल्या फांदीत
अंकुरते गीत,
सरस शरीराच्या अभ्यंतरात
छोटयाशा जीवाचे स्पंदन
प्रत्येक ठिकाणी
सगळ्या सजीवतेच्या मातृत्वावर
मी सही करते.

## सिंहासन

सिंहासन रिकामे राहिले,
ते सगळे थांबले,
पायऱ्यांच्या खाली.

सिंहासन बत्तीशीचे
अदृष्य पुतळे
इथे प्रश्न करू शकत नाहीत
त्यांचा सुंदर चेहेरा
उन्नत उरोज
समागमाचा जानुप्रदेश
स्वर आणि कुतूहलाची
कल्पनाच अवांतर आहे .....
राजकुमार,
तुम्ही तर थांबलात.
ह्या सिंहासनाची
रत्नजडीत कारागिरी
तुमच्यासाठी आहे .....
या, आरूढ व्हा
हे खरे आहे, सिंहासन जळते आहे
लालच आणि असत्याला
जाळून टाकणारी ही आग आहे.
पण घाबरू नका
कारणे काढू नका
तुमचा चेहेरा
क्षणात पांढरा, क्षणात काळा
पाडू देऊ नका.
राजकुमार
हे सिंहासन वीराचे आहे.

अभिषेकात, प्रेमात
नामर्दाला अधिकार नाही
सत्य—असत्य, न्याय—अन्याय
प्रश्न कर स्वतःलाच,
जळणे आणि भिजणे
ज्या शरीरासाठी एकच आहे
त्याचा स्वीकार कर.
बत्तीसवेळा नाही
हजारवेळा
हात ठेवा हृदयावर
त्याच्या उच्चारणाला हात लावा
विलासितेला निर्वस्त्र करा
राजपथावर,
हृदयाचा, बुद्धीचा हात धरा
अहंकाराचा पोशाख उतरवून
ये मर्दा ..... आरूढ हो सिंहासनावर.....

## आवड

थेंबभर आवड, हिला
जागा देण्यासाठी त्यादिवशी
आकाश तयार झाले नाही.
माती धसली
कोवळी पाने झडली,
झाडांवरून
घाबरलेला पक्षांचा थवा
उडून कुठे निघून गेला.
समुद्रदेखील तयार झाला नाही
त्याने नकार दिला .....
गर्जून उठले लाखो हत्यारे
लाखो सुरे .....

आणि आज
सगळ्या भिंतभर
धातूच्या चिमण्यांच्या गप्पा
प्लास्टिकच्या फांद्या–पानांचे हिरवेपण
जिथे उद्देश आहे फक्त,
निर्लज्ज गरज,
हिशेबी देणे–घेणे
तिथेच कोलाहल आहे माजलेला
प्रेम करा प्रेम करा......

## फेकले जात नाही

काहीही फेकले जात नाही
इतके की,
मोती कढून घेतलेला
शिंपला देखील .....

हात धरून बरोबर चालणाऱ्या
राजकुमारीला
जंगलात सोडून जाता येत नाही,
अर्ध्या वस्त्रात.
नाहीतर,
प्रायश्चित्त घ्यावे लागते
तोंड लपवून तबेल्यात

कोणतेही नाते
तोडून टाकता येत नाही.
शत्रूचीदेखील आठवण येते
वारंवार
शत्रूतेचीदेखील
असते एक ओढ,
एक आकर्षण.

इतकेच काय
पण फळाचे देठ देखील
तोडून फेकले जात नाही.
इथे–तिथे
फेकायची आणि टाकायची
एक निश्चित जागा असते .....

त्याचमुळे
आंब्याची कोयदेखील
फेकली जाते खताच्या ढिगावर
इकडे तिकडे नाही.

पण तू
तू जसे मला
अचानक धक्का देऊन
फेकून दिलेस
आपल्या कुशीतून
भर रस्त्यावर .....
अशाप्रकारे
आपल्या शत्रूलादेखील
मनुष्य फेकू शकत नाही.

## शोधतो आहेस मला

शोधतो आहेस मला,
माझे नाव घेऊन, बोलावतो आहेस.
मी इथे नाही हे
हजारो तोंडांनी
सिद्ध झाल्यानंतरदेखील?

सिंहासनाकडून,
मंत्रीमंडळातील,
खुशामत करणाऱ्या लोकांकडून
लाखो तुताऱ्यांच्या नादाकडून
जयघोषाकडून
माझे नाव तर
कधीपासून उच्चारले गेले नाही.
विस्मृतीच्या खोल खड्ड्यात
कुठेतरी दबले गेले आहे.

ही बातमी
पोहोचली नाही तुझ्यापर्यंत ?
लाखो तोंडामधे
आता धरले जात नाही
माझे नाव !
जबरदस्तीच्या बोटाने
जर घेतलेच कधी कोणी,
माझे नाव तर
खाली पडून
तुकडे तुकडे होऊन जातील
सगळी अक्षरे.

तीन अक्षरांनंतर
उच्चार आपली वाट हरवतात
खोटे वाटते आहे नं !
कोणालाही विचार !

पण मी विझले नाही
इथेच आहे
जन्मापासून होते जशी
अगदी तशीच्या तशी,
मोठ्या आवाजात
जाहीर करू शकत नाही स्वतःचे नाव
गर्दीमधे
पाठीमागून ढकलू शकत नाही
सर्वात पुढच्या रांगेत
जाऊ शकत नाही.

सोन्या–चांदीच्या सिंहासनावर
उमटवायला स्वतःचे नाव
पुढे होते.
"माझ्या गाण्यासारखे गाणे नाही"
म्हणायला जीभ रेटत नाही.
अर्धमेल्या, अर्ध्या वाळलेल्या,
सगळ्या पंक्ती, सगळे स्वर
आपले करूण रक्तहीन हात
माझ्याकडे पसरतात.
अगदी आजारी बाळासारखे
कडेवर घेण्याच्या आशेने.
त्याचवेळी
माझ्या स्वरातील कमीपणा
समजतो मला
यानंतरदेखील
शोधायची गरज असेल तर
शोधा,

इकडे – तिकडे नाही तर
प्रेम आणि अश्रूंनी भरलेल्या
माझ्या स्वतःच्याच पंक्तीमधे.

## चित्रकार

भर संध्याकाळी
मोकळ्या नदीच्या
निस्तब्ध पाऱ्यासारख्या पाण्यात
कोण बघतो आहे चेहेरा ?
नीलहंस
ना ढगांनी भरलेले आकाश ?

गड्डाभर चित्रांच्या
अदृष्य दुनियेत
शोधू शकत नव्हता कवी
अस्त व्यस्त
निवडत होता, फेकत होता
ताम्रवर्णी क्षितीजवलयातून
'ये' 'ये' अशी हाक कोणाची
हवेच्या पाठीशी टक्कर खाऊन
तुटत होती झणझण
तुकडे विखरत होते चोहीकडे
चित्र कुठे ? कुठे आहे चित्र ?

फुलनखरा तलावात
लाल कमळ
ओठ विलगून हसत होते
म्हणत होते नाही,
नाही बनवू शकला.
चित्रकारा,
तुझ्या अजब कुंचल्याला

स्थिरता शिवत नाही म्हणून
तुझ्या लाजवाब आरशात
जरासुद्धा जळमट लागत नाही
म्हणूनच मला चिडवतो आहेस ना ?

परिहासाच्या अश्रूंनी जर
नदीचा किनारा भिजला गेला
कदाचित दीर्घ श्वासाने
फाटून गेली जर छाती
कुंचल्याचे रंग चमकले तर
चमकेल कुंचला,
तुझ्याच आरशाला
आकाशाच्या भिंतीवर टांगून
कोण सांगेल असे की,
मी बसणार नाही
विशाल कॅनव्हासच्या समोरासमोर
अगदी तुझ्या जागेवर ?

## मामुली गोष्ट

विद्यापीठापासून कॉलेजपर्यंतचे
हे सारे आकाश
सांग ना मुके झाले आहे का?
बसच्या खिडकीतून वाकून
हाक मारू शकले नसते
माझे नाव धरून .....
खुणेने दाखवू शकले नसते
त्याचा इंद्रजाल महालाचा
उघडा दरवाजा !
त्यानंतर
मला दोन अजब पंख फुटणे
आणि बसमधून माझे बाहेर उडून जाणे
ही तर सगळी अगदी मामुली गोष्ट.

पण तो मुक्यासारखा
एखादया पत्र्याच्या तुकडयासारखा
खरोखरच जणू काही,
माझ्या स्वप्नांना
तो ओळखत नव्हता कधीही ———

दररोजचा विषाद
इतका परका वाटतो की,
वाटते
विषाद कधी नव्हताच
का आजही नाही.
माझे तर घनिष्ट नाते नाही कोणाशीच

तुमचे नातेच नसले तर
प्रेम कसले, दुःख कसले ?
पाऊस
माझा हात पकडून
ओढून नेऊ शकत नाही मला
आपल्या टपटप पडणाऱ्या साम्राज्यात,
विचारु शकत नाही
कोणाची वाट बघते आहेस का ———
त्यानंतर तर माझे
मोकळे होणे, तुटून पडणे
पावसासारखे, हुंदक्यासारखे
पिकलेल्या फळांच्या घोसासारखे ———

घरट्यात परतणाऱ्या चिमण्या
माझ्या खांद्यावरच्या टोपलीतून
एखादे फळ अथवा किडा
झपकन येऊन नेऊ शकत नाहीत.
त्यांना संशय आहे का ?
का त्यांना माहित आहे की,
त्यांच्यावर मंत्र टाकून
आकाशमार्गात स्थिर करावयाची
माझी योजना
त्याच योजनेच्या आड
माझे हसणे – रडणे
कितीवेळा काय माहीत !
चिमण्यांच्या रांगाच रांगा
कुआखाई नदीच्या प्रवाहासारख्या
पसरल्या होत्या
माझ्या अंगणात

आणि मी
झाडावर चढून
घामाने भरलेली

तोडून आणत होते
ओंजळभर चांदण्या
त्यानंतर तर आकाशकंदिलासारखी
सजवायला लागले त्या सगळ्यांना
रस्ताभर
जिथे जितका अंधार होता
त्या अंधाराच्या साम्राज्याकडे
आणि त्याच्या कोलाहलाकडे
लक्ष न देता !

## साक्ष

मुसळधार पावसातदेखील
कुठे कुठे दुभंगते कोरडी जमीन
तहानेने व्याकूळ
परत फिरतो अतिथी
थेंबभर पाणी नसते.

वाऱ्याच्या सिंहासनावर बसून
शून्याकडे जाणाऱ्या राणीच्या
लाकडाच्या मुकुटावर
जरीची साधी एक रेघदेखील
दिसत नाही कुठे.
छातीमध्ये चिखल, पाला–पाचोळा, अंधार,
गांडुळे आणि जळवा
खच्चून भरल्या आहेत.
पण पारिजाताच्या सुगंधाने
सारा परिसर दरवळला आहे.

ढगांच्या पर्वतातून
सूर्यकिरणांचा झरा बाहेर पडतो
साळाच्या वनात
गळून पडलेल्या पानांच्या पलंगावर
झोपलेली असते
धुरकट सावली.
माती दुभंगून बाहेर येते
व्याकूळ हाक कोणाची
'जाऊ नकोस'.

बघितली आहे अशी जागा
जिथे कधीही सूर्यकिरण पडले नाहीत.
जिथे
कदंबाचे स्वप्न
कधीही दचकल्याने मोडले नाही ———
आहे कुठे वितभर जमीन
जी,
इतका पाऊस पडल्यावर देखील
कधीही ओली झाली नाही ?

मी साक्षी आहे इथे
इथेच दगड झाला आहे माझा ———
इतके प्रेम
इतके समर्पण असतानाही
जे हृदय द्रवले नाही
जे ओठ थरथरले नाहीत
जे डोळे पाझरले नाहीत
जे रक्त उफाळून उठले नाही
त्याची मी साक्षी आहे
साक्षी आहे निष्ठुरतेची
माझ्यातच खोदलेली
किती कोण जाणे
वाकडी तिकडी अक्षरे,
आहेत पश्चात्तापाची ......

## सगळे काही आवडून

कशाला बोलावलेत ?
काय काय नाही बघितलेले मी ?
हसण्यामागचा अहंकार
कृपणाचा 'न्या' 'न्या' असा चित्कार
चिखलाच्या रंगाच्या अंधारात
बुडलेल्या गोगलगायीचा
बडेजाव,
मुकुटाच्या चमचमण्या मागची
किती धडपड, किती तयारी
स्वतःच्या खोटेपणाखेरीज हे आणखी काय आहे ?
आजकाल तर
हृदयाच्या ठोक्याच्या आसपास
एखादा दगड असल्यासारखा वाटतो.
जो खूप सहजपणे
एखादा कसोटीचा दगड असू शकतो.
अस्त्रदेखील असू शकतो.
किंवा पुष्कळ सतेजतेमधे
एखादा निष्ठुर
अचल दगडदेखील असू शकतो.

आत्ता ह्या क्षणाला माफ करते,
तर पुढच्याच क्षणी
माफ करू शकत नाही स्वतःला,
ह्या परतणाऱ्या उन्हाचे
नदीकिनारी हळूच मावळणे,
बदामाच्या झाडाची

सारी रात्र पाने गळणे,
नक्षत्रांचा खूप सुवास
आत्म्याला जाऊन भिडणे,
अनुशासनाच्या मोकळ्या हातात
हृदयाचे स्पंदन अडकणे,
सगळे काही घालवून बसलेल्या
माणसाच्या निश्वासाच्या
प्रतिध्वनीखेरीज
हे सगळे आणखी काय आहे ?

कशासाठी बोलावून आणलेस ?
स्वतःला माफ करेन
किंवा नाही करणार.
पण मला तर परतायला हवे
ह्याच क्षणी हे ऊन, नदी, गळणारी पाने,
सुवास, पश्चात्ताप, नक्षत्रे
हे सगळे आवडत असूनही
मला तर
मरावयास हवे ह्याच क्षणी !

## चला तर परत जाऊ या

परत जाऊ या म्हणतोस,
त्या नदीच्या किनारी ?
दाट धुक्याने
झाकूले गेले असेतील
दोन्ही किनारे
पाण्यावर धुके पसरले असेल
पाण्यातल्या वेलींसारखे
सगळे बुडले असेल रहस्याने
अगदी आत्म्यासारखे.

धुक्यावरती पडली असतील
सूर्याची तिरपी किरणे
मी, तू
माझ्या आतील ऊब
कुठल्या भल्या पहाटेत
कुठल्या महादेशात
जाऊन थांबणार आहोत आपण ?

नव्या फाल्गुनात धुळीचे घर बनवू या
आंब्याच्या मोहोराचा मुकुट तुझा
अर्थाचा, यशाचा
अलंकार माझा
चमकणाऱ्या शवांवर पाय ठेऊ या
पृथ्वीच्या चेहेऱ्यावर
सूर्यांनी जर आखल्या रेघा काही
तर किशोरी नक्षत्राच्या ताजेपणाला
चल शिंपडू या चोहीकडे .....

पृथ्वीच्या अंधाऱ्या बोगद्यातून
मुक्त करू माणसाला
त्याच्या स्वप्नाच्या समाधीला
जादूच्या कांडीचा स्पर्श करू.

ईश्वरी इच्छेच्या पंखांवर बसून
अविश्रांत फिरणाऱ्या नक्षत्रांना
खळाळत्या झऱ्याच्या
उगमाशी बोलावून घेऊ,
लाखो चिमण्यांना दाणे घालू
तर चल परत जाऊ .....

शेताच्या मधोमध
उभ्या उभ्या वीरणाऱ्या धुक्याला
मागे टाकून पुढे जाऊया.
प्राण्यांना
वाटून दिलेल्या दुःखातून
एक मोठा वाटा उचलून नेऊ
आणि भोगत राहू .....

*तन्मय धुळी* हा साहित्य अकादेमीने पुरस्कृत केलेल्या ह्याच नावाच्या ओडिया कवितासंग्रहाचा मराठी अनुवाद आहे. या कवितासंग्रहात एकूण छत्तीस कविता आहेत. ह्या कवितांमध्ये काव्यात्मक दृष्टी आणि 'स्व'चा घेतलेला शोध स्पष्टपणे दिसतो, अनुभवास येतो. ह्या कवितांमध्ये अनके दृष्टांत देऊन वैयक्तिक निरर्थकता मांडली आहे. आणि आध्यात्मिक विचारांचा सहजपणे सरळ सोप्या भाषेत संदेश दिलेला आढळतो. म्हणूनच ह्या कवितांचे महत्त्व अधिक आहे.

*तन्मय धुळीच्या* समर्थ कवियत्री **प्रतिभा सत्पथी** ह्यांचा जन्म कटक, ओडीसा इथे 1945 साली झाला. त्यांनी ओडीया भाषा आणि साहित्यात एम.ए. व पीएच.डी. केली आहे. वयाच्या पंधराव्या वर्षी त्यांनी आपल्या लिखाणाला सुरुवात केली. त्यांचे दहा कविता संग्रह, पाच निबंध आणि सात अनुवाद प्रकाशित झाले आहेत. दोन कविता संग्रहांचा हिंदी भाषेत अनुवाद झाला आहे. ओडिया साहित्यातील त्यांच्या योगदानासाठी त्यांना विषुव पुरस्कार, साहित्य अकादेमी पुरस्कार अशा अनेक पुरस्कारांनी सन्मानीत केले आहे.

He Tanmay Dhuli (Marathi),
₹ 125





ISBN 81-260-5133-5
9 788126 051335

Website : http.//www.sahitya-akademi.gov.in